माझा नमस्कार असो. हे गुरुमते, शमिततृष्णे ! माझी इच्छा पूर्ण करून तूं त्रैलोक्यांत विजयी हो.।। ४७।।

**(४८)**

अन्वय :- **हे आधिमंथने! अमले! हे प्रवरसरित्! (श्रीकृष्णे) अत्र सर्वैः तीर्थैः (च) सर्वाभिः सरिद्भिः अपि नुताम्। देवेन्द्रैः मुनिभिः अपि अत्यादृततटाम्। त्वां कः न सेवेत। हे कृष्णे! ते नमः। हे गुरुमते, शमिततृष्णे जय।।४८।।**

अर्थ :- सर्व मानसिक व्यथेला दूर करणा-या निर्मल व सर्व गंगादि नद्यांमध्यें श्रेष्ठ श्रीकृष्णे ! या भूलोकीं पुष्करादि सर्व तीर्थे आणि गंगादि सर्व पवित्र नद्या जिची स्तुति गातात आणि इन्द्रादि देव आणि मोठमोठे तपस्वी मुनि जिच्या तीरावर वास करतात, हे माते, अशा तुझा कोण बरें आश्रय करणार नाहीं ? तर सर्व करतीलच. हे कृष्णे ! तुला माझा नमस्कार असो. हे गुरुमते, शमिततृष्णे ! तुझा जयजयकार असो ।। ४८।।

**अतः त्वद्दर्शनं नित्यमस्त्विति पृथ्वीवृत्तेनाह -**

अर्थ :- म्हणून तुझें दर्शन नेहमीं असो, असें पृथ्वीनामवृत्तानें प्रतिपादन करतात.

**(४९)**

अन्वय :- **हे अनुकम्पोदये! अभये, धरेन्द्रतनये (श्रीकृष्णे) त्वां उपागतः अस्मि। हे हरीशरूपिणि, ईश्वरि (त्वं) जय। हे मणिद्युते! त्वा अर्थये। अये नदि! मदीयं हृत् दीनतां न व्रजतु। हे असिते! स्वये अक्षये अम्मये त्वदीये ते वपुषि (मम) दृक् अस्तु।।४९।।**

अर्थ :- हे कृपाशलिनी ! भयहारिणी ! सह्याद्रिकन्ये ! श्रीकृष्णे ! मी तुला शरण आलों आहे. हे हरिहरस्वरूपिणी ! भगवति माते ! तूं माझा उद्धार करून आपला उत्कर्ष प्रकट कर. हे इन्द्रनीलमणिनिभे् ! मी तुझी प्रार्थना करतों. हे नदि श्रीकृष्णे ! आतां माझें अंतःकरण दीन न होवो, आणि हे निर्मले ! तुझा त्या नित्य व जलरूपस्वरूपीं माझी सदा दृष्टि असो. तुला माझा नमस्कार असो.।। ४९।।

**कृष्णाया अविकृतत्वमाह शार्दुलविक्रीडितेन।**

अर्थ :- श्रीकृष्णावेणीच्या नामरूपामध्यें इतर गंगादिनद्यांप्रमाणें कसलाहि विकार-फेरफार झाला नाहीं असे शार्दूलविक्रीडितनामवृत्तानें सांगतात.

(५०)

अन्वय :- **काचित् (यमुना) प्रभोः पदयुगं क्षालयति। काचित् कं आरोहति। का अपि (नर्मदा) प्रभोः स्वेदात् प्रकटिता। का अपि (गोदावरी) जटादितः प्रकटिता। अपरा (मंदाकिनी) जटायां बद्धा (अभूत्) अपरा (गंगा शन्तनुना) उद्वाहिता। (अपरा रेवा भीमेन उद्वाहिता) काचन मानिनी (गंगा) उच्चैः इह पतिता। का अपि (भोगवती) अधः गता। हे कृष्णे! (त्वं) इह ते सत् (कृष्णा इति) नाम च रूपं अपि न त्यक्तम्।।५०।।**

अर्थ :- यमुना नदीनें ''कालिंदी'' असें नांव धारण करून ती श्रीकृष्णपत्नी झाली व दासीप्रमाणें पादप्रक्षालन केलें, व गंगा श्रीशंकराची दुसरी पत्नी होऊन त्यांच्या डोक्यावर जाऊन बसली. आणि कोणी एक नर्मदा नदी शंकराच्या घर्मापासून निर्माण झाली. कोणी गोदावरी नदी श्रीशंकराच्या जटेपासून निघाली. दुसरी मंदाकिनी नदी शंकराचे जटेंत बद्ध झाली. कोणी गंगानामक नदी शंतनुराजाची कामिनी

झाली. रेवा नदीचें भीमसेनानें पाणिग्रहण केलें आणि मोठ्या मानी गंगा व सरस्वती या नद्या कलह करून विष्णुलोकांतून भूलोकीं पडल्या, व भोगवती नदी पाताळांत गेली. अशा सर्व नद्या कांहीं ना कांहीं विकृति झालेल्या आहेत. पण हे कृष्णे ! तूं मात्र आपलें पवित्र श्रीकृष्णा असें नाम व श्यामवर्ण रूप या दोहोंचाहि त्याग केला नाहींस. हे निर्विकारिंणी तुला माझें नमन असो.।। ५०।।

**स्रग्धरा वृत्तेन हारबंधेन स्तौति -**

अर्थ :- हारबंधांत गुंफलेल्या स्रग्धरावृत्तानें स्तवन करतात.

(५१)

अन्वय :- **हे देवेड्ये, वेदवेद्ये, भवगृत् कृष्णे त्वं जय जय। गे कृपाकृष्टकृष्णे! तव भवहवराख्यां ग्रहीतॄन् त्राहि त्राहि। हे सत्यसंधे! (त्वं नः) सदा भूयः भूयः अभयोक्तीः वितर। हे कामेश या इह मोहप्रहर्त्री मेधअया तव तनुः (विद्यते) सा आदरात् मे मनसि (च) नयनयोः अस्तु।।५१।।**

अर्थ ः सर्वदेवस्तुते ! वेदांनी जाणलेल्या व भय दूर करणा-या कृष्णे, तूं या भूलोकीं सर्व प्रकारच्या उत्कर्षांनी विजयी हो. हे सदये माते ! जन्ममरणापासून मुक्त करणारें तुझें नामस्मरण करणा-याचें तूं रक्षण कर. हे सत्यप्रतिज्ञे ! तूं आम्हांला पुनः पुनः अभय देत जा. हे भक्तकामकल्पद्रुमा, श्रीदत्ता तुझी या कृष्णावेणीतीरावर मोहाला दूर करणारी व पवित्र मूर्ति आहे. ती मोठ्या आदरानें माझ्या मनांत आणि दोन्ही नयनांत नेहमीं असो. एवढ्यानेंच मी कृतकृत्य आहें.।। ५१।।

**श्रीकृष्णाश्रयान्मुक्तिरित्यनुष्टभाऽऽह गोमूत्रिकाबंधेन -**

अर्थ :- श्रीकृष्णानदीच्या आश्रयानें सद्गति मिळते असें गोमूत्रिकानामक बंधांत गुंफलेल्या अनुष्टुप्छंदाने सांगतात.

(५२)

अन्वय :- **यः भक्तः कृष्णां वृणुते। (सः) निरन्तरं पदं यायात्। (च) यः अभक्तः तृष्णां वृणुते (सः) निरन्तरं खेदं यायात्।।५२।।**

अर्थ :- जो पुण्यवान् भक्त स्नानादिरूपानें कृष्णेचें सेवन करतो, तो भेदरहित शाश्र्वत पदाला जातो, आणि जो अभक्त तृष्णेच्या मागें लागतो, तो नेहमीं दुःखाला प्राप्त होतो.।। ५२।।

**(५३)**

अन्वय :- **कृष्णास्थप्रेरितमतिः वासुदेवसरस्वती कृष्णां अस्तौत्। ततः नरसिंहसरस्वती प्रीयात्।।५३।।**

अर्थ :- श्रीकृष्णातीरावर असलेल्या श्रीदत्ताच्या प्रेरणेनें श्रीवासुदेवानंदसरस्वतींनीं ही कृष्णालहरीरूपानें कृष्णेची स्तुति केली आहे. त्यायोगें श्रीनरसिंहसरस्वती संतुष्ट होवोत.

श्रीकृष्णार्पणमस्तु।